जलसंपदा विभागातील कंत्राटाचेबाबत (सुरक्षा अनामत रकमेपोटी) बँक गॅरंटी स्वरुपात प्राप्त होणा-या बँक गॅरंटीजची पडताळणी, नुतनीकरण व रोखीकरण याबाबत मार्गदर्शक सूचना-

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक मजसुप्र-२०१४/(४८/१४)/लाक्षेवि (कामे)/ काअ-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३/११/ २०१४

वाचा : केंदिय दक्षता आयोग, नवी दिल्ली यांचे परिपत्रक क्रंमाक: ०१/०१/०८
दिनांक ३१/१२/२००७

प्रस्तावना :

जलसंपदा विभागाअंतर्गत विविध कामे कंत्राट पध्दतीने हाती घेण्यात येतात. या करीता प्रामुख्याने ब-१ प्रकारच्या निविदांचा वापर करण्यात येतो. निविदा मुल्यांकनास मान्यता मिळाल्यानंतर कंत्राटदारास निविदा स्वीकृतीबाबत कळवितांना त्याने भरावयाच्या सुरक्षा अनामत गॅरंटीची रक्कम व भरण्याची कालमर्यादा पत्रात नमुद केलेली असते. अनामत रक्कम कोणत्या स्वरुपात (Type of Instrument) भरलेली चालू शकते, याबाबत निविदाकारांना दिलेल्या सविस्तर सूचनांमध्ये तसेच निविदेतील सर्वसाधारण शर्तीमध्ये नमुद केलेले असते. बँक गॅरंटी स्वरुपात प्राप्त होणा-या अनामत रकमांबाबत अशा बँक गॅरंटीजची (बँक गॅरंटी देणा-या बँकेकडून) पडताळणी, आवश्यक तेथे विधीग्राहयता संपण्यापूर्वी नुतनीकरण व रोखीकरण करुन रक्कम प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे. सार्वजनिक बांधकाम संहीता परिच्छेद २१३ मध्ये या अनुषंगाने काही सूचना देण्यात आलेल्या आहेत. याबाबत केंद्रीय दक्षता आयोग, नवी दिल्ली यांचे दि.३१.१२.२००७ च्या कार्यालयीन ज्ञापना मध्ये सुस्पष्ट सूचना दिलेल्या असुन संबंधीत संस्थांनी याबाबत सविस्तर सूचना निर्गमित करणेबाबत नमुद आहे. अशा सविस्तर सूचनांअभावी बँक गॅरंटीज बाबत वेळेवर कार्यवाही होत नाही असे आढळून आले आहे.

जलसंपदा विभागामार्फत हाती घेतलेल्या व भविष्यात हाती घेण्यात येणा-या कोणत्याही कंत्राटाचे बाबत अशा प्रकारची खोटी किंवा बनावट बँक गॅरंटी प्रकरणे उद्भवू नये, तसेच बँक गॅरंटी बाबत वेळेत कार्यवाही व्हावी या दृष्टीकोनातून जलसंपदा विभागा मार्फत पुढीलप्रमाणे सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहे.

मार्गदर्शक सूचना :

**(अ). निविदा स्वीकृती पश्चात कंत्राटदाराने जमा करावयाच्या अनामत रकमेपोटी प्राप्त होणा-या बँक गॅरंटीजची पडताळणी :**

१. निविदा स्वीकृती बाबत कंत्राटदारास कळवितांना निविदा स्वीकृती पत्रात (letter of Acceptance) पुढील अटींचा अंतर्भाव करावा

**अट:** ज्या निविदांचे बाबत अनामत रक्कम बँक गॅरंटी स्वरुपात चालू शकते व कंत्राटदार अशी अनामत रक्कम बँक गॅरंटी स्वरुपात जमा करणार असेल तर तो ज्या बँकेकडील ती बँक गॅरंटी देणार आहे त्या बँकेव्दारेच मुळ बँक गॅरंटी थेट संबंधीत विभागास बँकेमार्फत रजिस्टर पोस्टाव्दारे पाठविण्यास यावी.

२. ज्या अपवादात्मक प्रकरणी बँक गॅरंटी त्यांचे ग्राहकाकडे (संबंधीत कंत्राटदाराकडे) हस्तांतरीत केलेली असेल तर त्याने सादर केलेल्या मुळ बँक गॅरंटीची दुय्यम प्रत (Unstamped duplicate copy) लगेचच संबंधीत विभागाला पाठविण्याबाबत कंत्राटदाराने बँकेस विनंती करावी.

३. ज्या प्रकरणी मुळ बँक गॅरंटी थेट कंत्राटदाराकडून विभागास प्राप्त झाली आहे, मात्र त्याची प्रत (Unstamped duplicate copy) संबंधीत बँकेकडून प्राप्त झालेली नाही, अशा प्रकरणाचे बाबत मुळ बँक गॅरंटीची छायांकित प्रत संबंधीत बँकेला रजिस्टर पोस्टाव्दारेच पाठवून सदर बँक गॅरंटी त्या बँकेनेच दिलेली आहे, याबाबत पडताळणी करण्यासाठी विनंती करण्यात यावी.

**४. वरीलप्रमाणे बँक गॅरंटीची पडताळणी झाल्याशिवाय कार्यारंभ आदेश देण्यात येवू नये.**

**(ब). बँक गॅरंटी ची वैधता कालावधी वाढवून घेणे बाबत :**

अनामत रकमेपोटी जमा करावयाच्या बँक गॅरंटीजचे बाबत बँक गॅरंटी कोणत्या दिनांकापर्यन्त वैध असणे आवश्यक आहे, हे सुध्दा निविदेत नमुद केलेले असते. असा वैधता दिनांक सर्वसाधारणपणे काम पुर्णत्वाचा विहीत दिनांकानंतर defect liability period व त्यानंतर काही विशिष्ट कालावधी (उदा. जागतिक बँक सहाय्यित प्रकरणावरील निविदांचे बाबत defect liability period संपण्याच्या पूढे २८ दिवसपर्यंत) असे नमूद केलेले असते. कंत्राटाच्या अमलबजावणी दरम्यान विविध कारणांस्तव निविदा पुर्णत्वाचा कालावधी सुधारीत केला जातो व कंत्राटास मुदतवाढ दिली जाते. अशा सर्व मुदत वाढ देण्यात येण्या-या कंत्राटाबाबत सक्षम अधिका-याने मुदतवाढ मंजूर केल्यानंतर याबाबत कंत्राटदारास लेखी कळविण्यापुर्वी सदर कंत्राटाच्या अनामत रकमेपोटी दिलेल्या बँक गॅरंटीची वैधता ही कामाचा सुधारीत पुर्णत्व दिनांक व त्या अनुषंगाने सुधारीत झालेल्या defect liability period संपण्याचा दिनांक यानुसार वाढवून घेण्यात यावी. कंत्राटदारास बॅक गॅरंटीची वैधता वाढवून घेण्यासाठी / नुतनीकरणासाठी कळवितांना वैधता वाढ / नुतनीकरणाचे पत्राचे बाबत वरील (अ) मध्ये नमूद कार्यपध्दती अवलंबवण्यात यावी.

**(क). बॅक गॅरंटीचे रोखीकरणा बाबत:**

(१) ज्या मध्ये निविदा शर्ती नुसार कार्यवाही करतांना सदर अनामत रकमेपोटी दिलेल्या बँक गॅरंटीचे रोखीकरण करुन संबंधीत बँकेकडून रक्कम प्राप्त करुन घ्यावयाची आहे, त्या प्रकरणी रोखीकरण बँक गॅरंटीच्या वैधता कालावधीतच करण्यात यावे.

(२) बँक गॅरंटीज नुतनीरकण/ विधी ग्राहयता वाढविण्याचेबाबत जर कंत्राटदार टाळाटाळ करत असेल तर त्याही प्रकरणी विधीग्राहय मुदत संपण्यापूर्वीच रोखीकरण करुन घ्यावे.

**(ड). खोटया बँक गॅरंटी प्रकरणी जबाबदारी निश्चित करणे बाबत:**

प्रत्येक विभागामध्ये बँक गॅरंटी पोटी प्राप्त होणा-या अनामत रकमेबाबत अद्यावत नोंदवही ठेवण्यात यावी. अशा बँक गॅरंटीजच्या पडताळणी, मुदतवाढ व रोखीकरण या बाबी वेळेवर पार न पडल्याने होणा-या आर्थिक नुकसानीची जबाबदारी संबंधीत कार्यकारी अभियंता, विभागीय लेखा अधिकारी किंवा लेखापाल, कंत्राटाशी संबधीत विभागातील लेखा तपासणारे लिपीक व निविदा लिपीक यांची समप्रमाणात राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४११०३१५०६४६०६२७ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tatyarao Narayanrao Munde

Digitally signed by Tatyarao Narayanrao Munde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Chief Engineer And Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tatyarao Narayanrao Munde
Date: 2014.11.03 15:22:10 +05'30'

(ता.ना. मुंडे)
मुख्य अभियंता व सहसचिव (पा)

**प्रत,**

१) महालेखापाल,१/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२) खाजगी सचिव, मा. मंत्री (कृखोपामं वगळून), जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
३) खाजगी सचिव, मा. मंत्री (कृखोपामं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) खाजगी सचिव, मा. मंत्री, महसूल व खार जमीन, मंत्रालय, मुंबई.
५) खाजगी सचिव, मा. राज्य मंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मा. विधान सभा / विधान परिषद सर्व सदस्य.

७) स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव (जसंप्र व विकास) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता व सहसचिव (द व प्र), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता व सहसचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता व सहसचिव (कृपातंल), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता व सहसचिव (पा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सर्व तांत्रिक उपसचिव, अवरसचिव.

**प्रत, आवश्यक कार्यवाहीसाठी**

१) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
४) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरगांबाद.
५) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
६) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
८) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व मुख्य अभियंता
९) मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
१०) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व अधीक्षक अभियंता
११) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंता
१२) मजसुप्र संग्रहार्थ

## Quarterly return of verification, timely extension of validity & encashment of Bank Guarantee

**Name of Circle:** **Quarter: ………… to …………..**

**Name of Division:**

| S. No | Bank Guarantee details | | | | Submission Details | | | Verification details | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | Issuing Bank & Branch | Date of Issue | Amount (Rs. In Lakhs) | Validity (date) | Name of Agency | Date | Purpose (EMD/S.D. /Add.S.D./ others) | Date of letter to the Bank | Bank's reply date | Whether Bank Guarantee confirmed (Y/No) |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |

| Extension of Validity of B.G | | | | | Encashment | | | Whether purpose of B.G.is over (Y/No | Whether B.G. returned to issuing Bank/ Agency | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Date of letter to Bank | Required extension (date) | Extended Bank Guarantee | | | Date of letter to Bank for encashment | Reason for encashment | Encashment done on (Date) | | | |
| | | Bank's letter (date) | Extended validity (Date) | Amount (Rs in Lakhs) | | | | | Yes /No | if Yes date |
| 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 | 21 | 22 |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |